जल जीवन मिशन अंतर्गत सर्वसाधारण (राज्य हिस्सा) घटकाखाली राज्य पाणी व स्वच्छता मिशनला निधी वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ २०७१)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०२४/प्र.क्र.३६९/पापु-१०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख : १३ फेब्रुवारी, २०२५

**वाचा-**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.जजमि -२०१९/प्र.क्र.१३८/पापु १० (०७), दि. ०४.०९.२०२०
२. सह सचिव, राष्ट्रीय जल जीवन मिशन, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.G-11011/2/2023-JJM-I-DDWS, दि. २८.०३.२०२४
३. अवर सचिव, राष्ट्रीय जल जीवन मिशन, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र. W-११०२०/१९७/२०१५-Water-I/१४, दि. १२.०७.२०२४
४. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. बजेट-२०२४/प्र.क्र.३६९/पापु-१०, दि. ०२.०८.२०२४
५. अवर सचिव, राष्ट्रीय जल जीवन मिशन, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र. W-११०२०/१९७/२०१५-Water-I/३१, दि. ०३.०९.२०२४
६. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. बजेट-२०२४/प्र.क्र.३६९/पापु-१०, दि. ११.०९.२०२४
७. शासन पत्र क्र. जेजेएम-२०२४/प्र.क्र.३९५/पा.पु.-१० दि. ०७.१०.२०२४
८. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांचे दिनांक ०६.०१.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना-**

राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना संदर्भाधिन क्र. १ अन्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन अंतर्गत केंद्र व राज्य वित्तीय आकृतीबंध १:१ आहे. जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षाकरीता सर्वसाधारण घटकांतर्गत (राज्य हिस्सा) लेखाशीर्ष २२१५ २०७१ खाली रु. २८००.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

जल जीवन मिशन अंतर्गत राज्याकरीता सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षासाठी एकूण रू. ५३५२.९३ कोटी (केंद्र हिस्सा) इतके नियतव्ययाची काल्पनिकरित्या तरतूद केले असल्याबाबत केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र. २ अन्वये कळविले आहे. त्यापैकी, संदर्भाधिन क्र.३ अन्वये सन २०२४-२०२५ वित्तीय वर्षातील प्रथम हप्ता रू. २६७६.४६५० कोटी मधील प्रथम भाग (First Tranche of First Instalment) म्हणून रु.८०२.९३९५ कोटी इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला ESCROW खात्यात उपलब्ध करुन दिला होता. त्यामध्ये सर्वसाधारण घटकांतर्गत रु.५४०.४३३१

कोटी इतक्या निधीचा समावेश होता. त्यानुसार संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये राज्य हिश्श्याच्या समरुप रु. ५४०.४३३१ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच संदर्भाधिन क्र.५ अन्वये सन २०२४-२०२५ वित्तीय वर्षातील प्रथम हप्ता रू. २६७६.४६५० कोटी मधील दुसरा भाग (Second Tranche of First Instalment) म्हणून रु. ८०२.९३९५ कोटी इतका केंद्र हिस्श्याचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला ESCROW खात्यात उपलब्ध करुन दिला आहे. त्यामध्ये सर्वसाधारण घटकाखालील रू. ५४०.४३३१ कोटीचा समावेश आहे. त्याअनुषंगाने संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये रू. ५४०.४३३१ कोटी इतका राज्य हिस्सा वितरीत करण्यात आला आहे.

केंद्र पुरस्कृत जल जीवन मिशन योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून पहिला हप्ता रू. २६७६.४६५० कोटी इतक्या रकमेपैकी पहिल्या हप्त्याचा तिसरा भाग (3rd tranche of 1st installment) मिळावा म्हणून संदर्भ क्र. ७ येथील पत्रान्वये केंद्र शासनाकडे मागणी करण्यात आलेली आहे. तथापि सदरचा निधी अद्यापि अप्राप्त आहे. परंतू सद्यस्थितीत जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदा, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालये यांच्याकडील योजना विविध टप्प्यांवर कार्यान्वित आहेत व त्यामुळे त्यांचेकडून मोठ्या प्रमाणात निधी मागणी करण्यात आली आहे.

सबब, योजना वेळेत पुर्ण न झाल्यास योजनेवर अधिकची रक्कम खर्च करावी लागणार आहे. तसेच अवर्षणग्रस्त भागातील पाणीपुरवठा योजना वेळेत पुर्ण न झाल्यास पाणी टंचाई उद्भवू शकते. त्यानुसार योजनेंतर्गत विविध टप्प्यावर सुरु असलेली कामे व योजनेवर निधी अभावी विपरित परिणाम होवू नये याकरिता जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनामार्फत सर्वसाधारण घटक कार्यक्रमांतर्गत भविष्यात प्राप्त होणाऱ्या केंद्र हिश्श्याच्या समरूप राज्य हिश्श्याचा निधी रू. ५४०.४३३१ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२४- २०२५ या आर्थिक वर्षामध्ये सर्वसाधारण घटकांतर्गत (राज्य हिस्सा) "मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) जल जीवन अभियान यासाठी अनुदान (राज्य हिस्सा ५०%)(कार्यक्रम) (२२१५ २०७१)" या लेखाशिर्षांतर्गत ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रु. ५४०.४३३१ कोटी (अक्षरी-रु. पाचशे चाळीस कोटी त्रेचाळीस लक्ष एकतीस हजार फक्त) इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यामध्ये वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC0000146) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात

यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC०००९१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

४. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका या मधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि. २५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच सदरचा निधी आतापर्यंत पूर्ण झालेल्या आणि दिनांक ३१.०३.२०२५ पर्यंत पूर्ण होणाऱ्या योजना /कामांसाठीच, वितरीत करण्यात यावा. याबाबतची दक्षता संबंधीत अंमलबजावणी यंत्रणा व मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांची राहील. सदर राज्य हिश्श्याच्या समप्रमाणात केंद्र हिस्सा ESCROW खात्यामध्ये केंद्र शासनाकडून प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांची राहिल.

५. सदर शासन निर्णय शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१३१३२००८१९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2025.02.13 13:21:36 +05'30'

**(रविंद्र भराटे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपसचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

२. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन-पापु १०